राष्ट्रीय सेवा योजना
सन २०१२-१३ व २०१३ - १४ या वर्षाचे सहाय्यक अनुदानाचे (योजनेतर)- संबंधित विद्यापीठांना अंतिम हप्त्याचे प्रदान

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः रासेयो २०१५/(०५/१५)/साशि-७
मंत्रालय कक्ष, एलफिन्स्टन तंत्र विद्यालय परिसर,
मुंबई ४०० ००१
तारीख: ०९ फेब्रुवारी, २०१५

वाचा :

क्रमांकः भारत सरकार, युवा कार्य व क्रिडा विभाग, शास्त्री भवन, नवी दिल्ली यांचे क्र.डी.ओ.नं. जे १२०११/०२/२०१४- एनएसएस, दिनांक २९ ऑगस्ट,२०१४ चे पत्र

प्रस्तावना :

राष्ट्रीय सेवा योजना ही केंद्र शासन पुरस्कृत योजना असून या योजनेअंतर्गत नियमित व विशेष शिबीर कार्यक्रमांसाठी अनुक्रमे ३,१०,१२४ व १,५५,०६२ इतकी विद्यार्थी संख्या महाराष्ट्र राज्यासाठी मंजूर केली आहे. प्रशासकीय मान्यता घेऊन सर्व विद्यापीठांना प्रवर्गनिहाय विद्यार्थी संख्येचे वाटप करण्यात येते. विद्यापीठांना राष्ट्रीय सेवा योजनेचे उपक्रम राबविताना होणारा खर्च भागविण्यासाठी प्रत्येक वर्षी नियमित कार्यक्रम रु. २५०/- आणि विशेष शिबीर कार्यक्रम रु. ४५०/- प्रति विद्यार्थी या दराने सहाय्यक अनुदानाचे वितरण करण्यांत येते. केंद्र हिस्सा ७ भाग व राज्य हिस्सा ५ भाग या प्रमाणात अनुदानाचे वितरण करण्यांत येते. सन २०१२-१३ व २०१३ - १४ मध्ये केंद्र शासनाकडून ७ भाग रक्कमेपैकी फक्त ७५ % व ६०% रक्कम प्राप्त झाल्याने तेवढयाच रकमेचा राज्य शासनाचा ५ भाग हिस्सा मिळवून विद्यापीठांना सन २०१२-१३ व २०१३ — १४ चे अनुदान वाटप करण्यात आले होते.

राष्ट्रीय सेवा योजनेच्या तरतूदीनुसार या योजनेचा खर्च भागविण्यासाठी राज्याच्या सन २०१४ - १५ च्या अर्थसंकल्पात योजनेतर मध्ये सहाय्यक अनुदान राज्य हिस्सा रु. ६१३७९/- (हजारात) व केंद्र हिस्सा रक्कम रु. ८५९३०/- (हजारात) इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर सहाय्यक अनुदान वित्तिय अधिकार १९७८ भाग पहिला उपविभाग १ अनुक्रमांक २७ नियम क्रमांक १४९ अन्वये मंजूर करण्यांत येत आहे. आता केंद्र शासनाच्या संदर्भित पत्रान्वये सन २०१२-१३ व २०१३ - १४ चा अनुदानाचा शिल्लक रक्कमेचा हप्ता प्राप्त झाला आहे. त्यामध्ये राज्य शासनाच्या हिश्याची ५

भाग रक्कम मिळून संबंधित विद्यापीठांना सन २०१२-१३ व २०१३ - १४ चा अनुदानाचा अंतिम हप्ता मंजूर करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

परिशिष्ट - अ मधील (सोबत जोडले आहे) विद्यापीठांना सन २०१२-१३ व **२०१३ - १४** चा सहाय्यक अनुदानाचा अंतिम हप्ता म्हणून नियमित कार्यक्रमासाठी रक्कम रु.३**,८६,५५,८५३/-** व विशेष शिबिर कार्यक्रमासाठी रु.**३,५५,४३,२५७/-** अशी एकूण रक्कम रु.**७,४१,९९,११०/-** आहे. सदर रक्कमेचे केंद्र व राज्य शासन यांच्या हिश्याचे ७:५ या प्रमाणात वितरण करण्यांत येते.

यापैकी केंद्र हिस्सा रक्कम रु.४,३३,४५,३५७/-(रुपये चार कोटी, तेहतीस लाख , पंचेचाळीस हजार, तीनशे सत्तावन्न फक्त) व राज्य हिस्सा रक्कम रु. ३,०८,५३,७५३/- (रुपये तीन कोटी, आठ लाख, त्रेपन्न हजार , सातशे त्रेपन्न फक्त ) एवढ्या योजनेतर अनुदानाच्या रक्कमेस मासिक विवरण पत्राच्या अनुदानास अधिन राहून वितरणास मंजूरी देण्यात येत आहे. (विद्यापीठांना देय रक्कमेचा तपशिल सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दिलेला आहे.)

उच्च व तंत्र शिक्षण विभागाने राष्ट्रीय सेवा योजनेसाठी सन २०१४- १५ या वर्षातील अनुदान वितरणासाठी अर्थसंकल्पामध्ये मंजूर केलेल्या तरतूदीनुसार योजनेतर मध्ये सहाय्यक अनुदान राज्य हिस्सा रु. ६१३७९/-(हजारात) व केंद्र हिस्सा रक्कम रु.८५९३०/-(हजारात) या रक्कमेतून सन २०१२-१३ व २०१३ - १४ साठी शिल्लक अंतिम हप्ता म्हणून मंजूर केलेल्या योजनेत्तर अनुदानाच्या वितरणासाठी स्वतंत्र देयके तयार करुन ती अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई या कार्यालयाकडे सादर करावीत. या आदेशातील अनुदानाच्या रक्कमेच्या देयकावर स्वाक्षरी करण्याचे प्राधिकार या विभागाचे श्री.सं.श.चौबळ, कक्ष अधिकारी (लेखा) यांना प्रदान करण्यांत येत आहेत. तसेच या देयकावर नियंत्रण अधिकारी म्हणून श्रीमती रो. स.भालेकर, उप सचिव (लेखा) हे प्रतिस्वाक्षरी करतील. अशा प्रकारे अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरीत केलेली अनुदानाची रक्कम या कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिकारी यांच्यार्फत संबंधित विद्यापीठाचे कुलसचिव यांना वितरीत करण्यात येईल. त्यांनी सदर अनुदान रकमेचे त्यांच्या अधिपत्याखालील महाविद्यालयांना प्रवर्गनिहाय वाटप करुन सहायक अनुदान वाटप विवरणपत्र शासनास त्वरित पाठवावे.

यासाठी होणारा खर्च **<u>सन २०१४ - १५</u>** या वर्षासाठी तरतूद केलेल्या मंजूर अनुदानातून पुढे नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

<u>योजनेतर (Non-Plan) केंद्र हिस्सा अनुदानाचे लेखाशिर्ष आणि रक्कम</u>

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

मागणी क्रमांक डब्ल्यू - ६

२२५१ - सेक्रेटरीएट - सामाजिक सेवा

०९० - सेक्रेटरीएट -

(०३) राष्ट्रीय सेवा योजना -

(०३) (०१) राष्ट्रीय सेवा योजना

(२२५१ ०६८८) (योजनेतर) (केंद्र हिस्सा)

३१ - सहाय्यक अनुदान **रु. ४,३३,४५,३५७/-**

(अक्षरी रुपये चार कोटी, तेहतीस लाख , पंचेचाळीस हजार, तीनशे सत्तावन्न फक्त)

<u>योजनेतर (Non-Plan) राज्य हिस्सा अनुदानाचे लेखाशिर्ष आणि रक्कम</u>

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

मागणी क्रमांक डब्ल्यू - ६

२२५१ - सेक्रेटरीएट - सामाजिक सेवा

०९० - सेक्रेटरीएट -

(०२) राष्ट्रीय सेवा योजना -

(०२) (०१) राष्ट्रीय सेवा योजना

(२२५१ ०३३८) (योजनेतर) (राज्य हिस्सा)

३१ - <u>सहाय्यक अनुदान</u> **रु. ३,०८,५३,७५३/-**

(अक्षरी रुपये तीन कोटी, आठ लाख, त्रेपन्न हजार-
- सातशे त्रेपन्न फक्त)

---

**एकूण रककम - रु. ७,४१,९९,११०/-**

**(अक्षरी रुपये सात कोटी एकेचाळीस लाख नव्याण्णव हजार एकशे दहा फक्त)**

योजनेत्तर मधील उपरोक्त रकमेला वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २६/व्यय-५, दिनांक २७ जानेवारी, २०१५ अन्वये मान्यता घेण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०९१२१२०८७९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Hansra Salunkhe

Digitally signed by Atul Hansra Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Atul Hansra Salunkhe
Date: 2015.02.09 12:21:45 +05'30'

**( डॉ. अतुल साळुंके )**

राज्य संपर्क अधिकारी/विशेष कार्य अधिकारी

**प्रति,**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र - १, मुंबई
४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र - २, नागपूर
५) अवर सचिव, भारत सरकार, संस्कृती, युवा कार्य व क्रिडा मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली (पत्राद्वारे)
६) सहाय्यक कार्यक्रम सल्लागार, राष्ट्रीय सेवा योजना विभागीय केंद्र, पुणे
७) सर्व संबंधित विद्यापीठाचे कुलसचिव / संचालक
८) सर्व संबंधित विद्यापीठाचे / संचालनालयाचे राष्ट्रीय सेवा योजना विभागाचे कार्यक्रम समन्वयक
९) वित्त विभाग (व्यय - ५), वित्त विभाग, (अर्थसंकल्प ८)
१०) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, साशि - १/ लेखा शाखा /
११) निवड नस्ती साशि- ७